**अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांसाठी सुधारित पोलीस शिपाई भरती पूर्व परिक्षा प्रशिक्षण वर्ग योजनेस मान्यता .......**

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन निर्णय क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१८८/०९/का.१
दि. २७ जुलै, २००९

संदर्भ : सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. आरएमएन-२००४/ ४०५/ प्र.क्र.३३ (दोन)/०४/३५, दि. २ नोव्हेंबर, २००४

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या १५ कलमी कार्यक्रमांतर्गत दिलेल्या सूचनांनुसार अल्पसंख्याक समाजांमधील उमेदवारांना स्पर्धात्मक परिक्षेमध्ये समान संधी मिळण्याच्या दृष्टीने तसेच शासकीय सेवेमध्ये अल्पसंख्याकांचे असलेले अत्यल्प प्रमाण विचारात घेता, अल्पसंख्याक समाजामधील उमेदवारांसाठी स्पर्धा परिक्षा प्रशिक्षण वर्ग आणि मार्गदर्शन केंद्रे सुरु करण्यास संदर्भांकित शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदर योजनेअंतर्गत दिला जाणारा निधी कमी असल्याने सदर योजना राबविण्यासाठी प्रशिक्षण संस्थांचा फारसा प्रतिसाद मिळत नाही त्यामुळे पर्याप्त संख्येमध्ये उमेदवारांना प्रशिक्षण दिले जाऊं शकत नाही. यास्तव सदर योजनेमध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार प्रचलित योजनेत आता बदल करण्याचा निर्णय शासनाने घेतला असून सुधारित योजनेचे स्वरुप व ठळक वैशिष्टये खालीलप्रमाणे राहतील.

**शासन निर्णय :-**

**अ) अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांसाठी पोलिस शिपाई भरती पूर्व परिक्षा प्रशिक्षण योजनेचे स्वरुप :-**

**१) कालावधी :-** या योजनेतंर्गत प्रशिक्षणाचा कालावधी २ महिन्यांचा राहील.

**२) लेखी परिक्षा व मुलाखतीसाठीचे प्रशिक्षण :-** प्रशिक्षण कालावधीत अल्पसंख्याक उमेदवारांना पोलीस शिपाई भरती पूर्व परिक्षेसाठी पूर्व तयारीकरिता मराठी भाषा, सामान्य ज्ञान, लेखी परिक्षा, मानचित्र अभ्यास, मुलाखत कौशल्ये याबाबत प्रशिक्षण देण्यात येईल.

**३) मैदानी चाचणीचे प्रशिक्षण :-** प्रत्येक प्रशिक्षणार्थ्यांस धावणे, १०० मीटर, ४०० मीटर, ८०० मीटर, उंच उडी, लांब उडी, गोळा फेक, अडथळयांची शर्यत, स्टँडिंग रोप, मंकी रोप, रस्सी चढणे (रॅपलींग), सीटअप्स, पुल-अप्स, चिनअप, पद कवायत, रायफल, फायरिंग, ट्रेकिंग, सुविधा उपलब्ध असल्यास पोहणे इत्यादी विषयांचे शास्त्रशुध्द प्रशिक्षण देण्यात येईल.

**४) अन्य प्रशिक्षण :-** प्रत्येक प्रशिक्षणार्थ्यास अग्निशमन, रोड ट्रॅफिक ट्रेनिंग, प्रथामोपचार, स्वास्थ्यशिक्षा, वायरलेस कम्युनिकेशन, व्यक्तिमत्व विकास, आपत्ती निवारण व्यवस्थापन, वाद्यवृंद प्रशिक्षण याबाबतचे प्रशिक्षणही देण्यात येईल.

**ब) सदर योजनेअंतर्गत उमेदवारांच्या निवडीसाठी अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहतील.**

१) प्रशिक्षणार्थींचे वार्षिक कौटुंबिक उत्पन्न रु.२.५० लाख (रु. दोन लाख पन्नास हजार फक्त) पेक्षा जास्त नसावे.

२) उमेदवार हा अल्पसंख्याक समाजातील असावा.

३) उमेदवार हा १८ ते २५ या वयोगटातील असावा.

४) उमदेवाराची उंची पुरुष १६५ सेंमी व महिला १५५ सेंमी छाती - पुरुष ७९ सेंमी (फुगवून ८४ सेंमी)

५) शैक्षणिक पात्रता इ. १२ वी पास असावा.

६) रहिवासी दाखला, सेवायोजन कार्यालयांतर्गत नाव नोंदणी दाखला व ओळखपत्राची सत्यप्रत देणे आवश्यक राहील.

७) उमेदवार शारिरिकदृष्टया निरोगी व सक्षम असावा.

८) निवडलेल्या उमेदवारांपैकी किमान ७० उमेदवार मुस्लिम अल्पसंख्याक समाजातील, २० उमेदवार बौध्द समाजातील, ४ उमेदवार ख्रिश्चन समाजातील, ४ उमेदवार जैन समाजातील, आणि प्रत्येक एक उमेदवार शीख व पारसी समाजामधून निवडण्यात येईल. ख्रिश्चन, जैन, शीख आणि पारसी समाजामधून उमेदवार उपलब्ध न झाल्यास इतर अल्पसंख्याक समाजामधील उमेदवार निवडण्यात येतील.

**क) निवड प्रक्रिया :-** प्रशिक्षणासाठी उमेदवारांची निवड करतांना गृह विभागाद्वारे निश्चित केलेली शैक्षणिक अर्हता व शारिरिक पात्रता धारण करणा-या प्रत्येक जिल्हयातील अल्पसंख्याक समाजातील उमेदवारांकडून जाहिरातीद्वारे अर्ज मागवून त्यामधून १०० उमेदवारांची निवड जिल्हास्तरीय निवड समितीमार्फत करण्यात येईल. जिल्हा स्तरीय निवड समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १) जिल्हाधिकारी, | - | अध्यक्ष |
| २) जिल्हा पोलीस अधिक्षक/पोलीस आयुक्त, | - | सदस्य |
| ३) जिल्हाधिका-यांनी नियुक्त केलेला जिल्हयात कार्यरत असलेला अल्पसंख्याक समाजातील एक अधिकारी | - | सदस्य |
| ४) जिल्हा समाज कल्याण अधिकारी. | - | सदस्य |
| ५) निवासी उपजिल्हाधिकारी | - | सदस्य सचिव |

संबंधित जिल्हाधिकारी आवश्यकतेनुसार जिल्हा स्तरीय निवड समितीवर उपजिल्हाधिकारी/ पोलीस उपअधिक्षक यांच्या दर्जाच्या अधिका-यांची नेमणूक करु शकतील.

सदर बाबतीत वृत्तपत्रांमध्ये सविस्तर जाहिरात प्रसिध्द करुन तारीख निश्चित करुन उमेदवारांना उपस्थित राहण्याबाबत सूचना देण्यात याव्यात आणि उमेदवारांची निवड करण्यात यावी. निवड प्रकिया पारदर्शकपणे पूर्ण केली जाईल याकडे कटाक्षाने लक्ष द्यावे.

**ड) प्रशिक्षण संस्थांची निवड :-**

१) पोलीस शिपाई भरती पूर्व परिक्षा प्रशिक्षण देण्यासाठी वर्तमानपत्रामध्ये जाहिरात प्रसिध्द करुन इच्छुक संस्थांकडून अर्ज मागविण्यात यावेत.

२) इच्छुक संस्थांनी प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिका-यांकडे विहित नमुन्यात अर्ज करावा.

३) शासनमान्य, नोंदणीकृत, नामांकित आणि अनुभवी शैक्षणिक संस्था (मान्यता प्राप्त शाळा/ महाविद्यालये) आणि प्रशिक्षण संस्था यांच्याकडून प्राप्त झालेल्या अर्जांमधून प्रशिक्षण संस्थांची निवड करण्यात यावी.

४) अशा संस्थांना शैक्षणिक कार्याचा/प्रशिक्षणाचा किमान पांच वर्षांचा अनुभव असणे आवश्यक आहे.

५) संस्थांकडे प्रशिक्षणासाठी पुरेशा प्रमाणात सामान्यज्ञान, मराठी भाषा आणि शारिरिक क्षमता हे विषय शिकविणारे तज्ञ प्रशिक्षक/प्राध्यापक, वर्गखोल्या, ग्रंथालय, वाचनालय, स्वच्छतागृहे आणि खेळाचे मैदान या सोयी उपलब्ध असाव्यात.

६) संस्थेने अर्जासोबत संस्थेला शासन मान्यता मिळाल्याचा नोंदणी दाखला, संस्थेची नियमावली, शैक्षणिक प्रशिक्षण विषयक कामाचा अनुभव, उपलब्ध तज्ञ प्रशिक्षक यांची माहिती देणे आवश्यक आहे.

७) उपरोक्त परिच्छेद- **क** मध्ये नमूद केलेली समिती इच्छुक संस्थांकडून प्राप्त अर्जांची छाननी करुन आवश्यकतेनुसार स्थळ पाहणी करुन संस्थांची अंतिम निवड करेल.

८) निवड केलेल्या संस्थेसोबत प्रशिक्षणासंदर्भात **प्रपत्र-१** येथे विहित केलेल्या नमून्यामध्ये करारनामा करण्यात येईल. सदर करारनाम्यावर निवडलेल्या संस्थेचे अध्यक्ष, सचिव अथवा प्राचार्य आणि शासनाच्या वतीने जिल्हाधिकारी नामनिर्देशित करतील असा संबंधित जिल्हयांमधील उपजिल्हाधिकारी यापेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी स्वाक्षरी करेल.

९) प्रशिक्षण वर्गामध्ये किमान तीन तास वर्ग प्रशिक्षण आणि दोन तास मैदानी प्रशिक्षण द्यावे.

**इ) प्रशिक्षणावरील खर्चाचे निकष खालीलप्रमाणे राहतील.**

१) निवडलेल्या प्रत्येक प्रशिक्षणार्थीस प्रशिक्षणादरम्यान रु.१५००/- (रु. एक हजार पाचशे फक्त) प्रतिमाह प्रमाणे विद्यावेतन देण्यात येईल.

२) निवडलेल्या प्रशिक्षण संस्थेस प्रशिक्षणार्थीथीं द्यावयाचे वाचन साहित्य आणि प्रशासकीय बाबींसाठी संस्थेस प्रति प्रशिक्षणार्थी रु.३००/- प्रमाणे अनुदान देण्यात येईल.

३) निवडलेल्या प्रशिक्षण संस्थेस प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याकरिता सामान्य ज्ञान, मराठी भाषा आणि शारिरिक क्षमता हे विषय शिकविण्याकरिता दोन प्रशिक्षकांसाठी प्रतिमाह एकूण रु.३०,०००/- (रु.तीस हजार फक्त) प्रमाणे दोन महिन्यांसाठी एकूण रु.६०,०००/- (रु. साठ हजार फक्त) एवढे मानधन देण्यात येईल.

४) निवडलेल्या प्रत्येक प्रशिक्षणार्थीना प्रशिक्षणादरम्यान चहापान व अल्पोपहार देण्यासाठी होणा-या खर्चापोटी रु.१५/-प्रतिदिन प्रति प्रशिक्षणार्थी एवढे अनुदान प्रशिक्षण संस्थेस देण्यात येईल.

५) गणवेश साहित्यासाठी (गणवेश, बुट, मोजे, बनियन इ.) प्रत्येक प्रशिक्षणार्थीस रु. १०००/- (रु. एक हजार फक्त) एवढे एकरकमी अनुदान देण्यात येईल.

६) संबंधित जिल्हाधिका-यांकडे प्रशिक्षणासाठीचा निधी वितरित करण्यात येईल.

७) निवड केलेल्या संस्थेने करारनामा आणि प्रशिक्षण सुरु करुन त्या संदर्भातील अहवाल सादर केल्यानंतर एकूण प्रशिक्षण खर्चाच्या ५०% रक्कम आगाऊ रक्कम म्हणून देण्यात येईल आणि उर्वरित ५०% रक्कम प्रशिक्षण समाधानकारकरीत्या पूर्ण झाल्यानंतर अदा करण्यात येईल.

८) संस्थेने मध्येच प्रशिक्षण बंद केल्यास अथवा इतर कारणांमुळे प्रशिक्षण बंद झाल्यास प्रशिक्षणाचे दिवस वजा जाता उर्वरित रक्कम संस्थेकडून वसूल करण्यात येईल.

प्रशिक्षणासाठी वर्ष २००९-१० साठी होणा-या एकूण रु. २,१७,२५,०००/- (रु. दोन कोटी सतरा लाख पंचवीस हजार फक्त) एवढया खर्चास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्चाचा तपशील खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | विषय | खर्च रु. |
|---|---|---|
| १ | प्रशिक्षणार्थीना विद्यावेतन देण्यासाठी येणारा खर्च (रु.१५००/- प्रति प्रशिक्षणार्थी प्रति माह प्रमाणे ) | रु. १,०५,००,०००/- |
| २ | प्रशिक्षणा दरम्यान (५० दिवसांसाठी) उमेदवांराना अल्पोपहार व चहापान इ.साठीचा खर्च (रु.१५ प्रति उमेदवार) | रु. २६,२५,०००/- |
| ३ | प्रशिक्षण संस्थेस स्टडी मटेरीयल व इतर प्रशासकीय बाबींसाठी द्यावयाचा खर्च (५० प्रशिक्षण केंद्रासाठी) | रु. २१,००,०००/- |
| ४ | गणवेश साहित्य (प्रत्येक उमेदवारास ड्रेस, बूट,मौजे, बनियन व इतर साहित्य यासाठी रु.१०००/- प्रति प्रशिक्षणार्थी प्रमाणे) | रु. ३५,००,०००/- |
| ५ | प्रशिक्षकाचे मानधन (५० प्रशिक्षण केंद्रांसाठी) रु.१५,०००/- प्रतिप्रशिक्षक प्रतिमाह प्रमाणे दोन प्रशिक्षकासाठी रु.६०,०००/- प्रति प्रशिक्षण सत्रप्रमाणे | रु. ३०,००,०००/- |
| | एकूण खर्च | रु. २,१७,२५,०००/- |

**ई) अनुदान वितरण व लेखे :-**

पोलीस भरती पूर्व परिक्षा प्रशिक्षण वर्गासाठी होणारा खर्च महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास **"मागणी क्रमांक २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१)(१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५-८ ३१ सहाय्यक अनुदाने"** या लेखाशीर्षातंर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

जिल्हाधिका-यांकडून संस्थेसोबत केलेला करारनामा, प्रशिक्षण सुरु झाल्याबाबतचा अहवाल, प्रशिक्षणार्थींची यादी, इ. कागदपत्रे सादर केल्यानंतर सदर प्रशिक्षणासाठी लागणारा निधी सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांनी जिल्हाधिकारी यांच्याकडे वितरित करावा. संबंधित जिल्हाधिका-यांनी आवश्यकतेनुसार सदर रक्कम आहरित करुन प्रशिक्षण संस्थेस अदा करावी. यासाठी विहित केलेल्या वित्तीय कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

सदर बाबतीतील लेखे विहित नमून्यामध्ये आणि विहित पध्दतीनुसार ठेवण्यात यावेत.

सदर प्रशिक्षणामुळे प्रशिक्षित मनुष्यबळाचा फायदा पोलीस दलास होणार असल्याने सदर प्रशिक्षण कार्यक्रम गुणवत्तापूर्ण राहील याकडे संबंधित पोलीस आयुक्त/जिल्हा पोलीस अधिक्षक यांनी कटाक्षाने लक्ष देणे द्यावे. प्रशिक्षणार्थीची शारिरिक क्षमता तपासण्याची जबाबदारी पोलीस आयुक्त/ जिल्हा पोलीस अधिक्षक यांची राहील. तसेच प्रशिक्षण संस्थांसाठी जिल्हाकेंद्रित (District specific) अभ्यासक्रम निश्चित करणे, प्रशिक्षार्थींना शारिरिक प्रशिक्षणासाठी मैदान व इतर सुविधा आवश्यकतेनुसार उपलब्ध करुन देण्याची व मार्गदर्शन करण्याची जबाबदारीही पोलीस आयुक्त/ जिल्हा पोलीस अधिक्षक यांची राहील.

प्रशिक्षण पूर्ण केलेल्या उमेदवारांना प्रशिक्षण संस्थांचे प्रमुख, जिल्हाधिकारी आणि जिल्हा पोलीस अधिक्षक/पोलीस आयुक्त यांच्या स्वाक्षरीने प्रमाणपत्रे देण्यात येतील.

प्रशिक्षण संस्थांनी प्रशिक्षित उमेदवारांची यादी जिल्हा पोलीस अधिक्षक/पोलीस आयुक्त यांच्याकडे पाठवावी. त्यानुसार पोलीस आयुक्त/जिल्हा पोलीस अधिक्षक कार्यालयाकडून वेळोवेळी होणा-या पोलीस भरतीसाठी संबंधित उमेदवारांना उपस्थित राहण्याबाबत कळविण्यात यावे.

प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर संस्थेकडून प्राप्त झालेला अहवाल हजेरीपत्रक प्रशिक्षणार्थींची यादी आणि प्रशिक्षणासाठी झालेल्या खर्चाचा गोषवारा इ. माहिती जिल्हाधिका-यांनी सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग आणि अल्पसंख्याक विकास विभाग, महाराष्ट्र शासन यांना सादर करावा.

हे आदेश गृह विभागाच्या सहमतीने आणि महाराष्ट्र वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग ३ परिच्छेद २७ (२) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४३४/०९/व्यय-४, दि. १८.७.२००९ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २००९०७२७१८३५२५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**सही/-**
**( उ.सं.दांडेकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग
उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
पोलीस महासंचालक
पोलीस आयुक्त (सर्व)
विशेष पोलीस महानिरिक्षक (सर्व)
जिल्हा पोलीस अधिक्षक (सर्व)
संचालक, लेखा व कोषागारे
सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
सर्व मंत्रालयीन विभाग

उपसचिव, वित्त विभाग व्यय-४, मंत्रालय, मुंबई
उपसचिव, नियोजन विभाग १४७५, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती.

(महाराष्ट्र शासन, अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१८८/ ०९/का.१ दि. २७ जुलै, २००९ चे सहपत्र )

# <u>प्रपत्र-१</u>

**“ पोलिस शिपाई भरतीपूर्व परिक्षा प्रशिक्षण कार्यक्रम ” या योजनेअंतर्गत ............... जिल्हयामध्ये मुस्लिम,ख्रिश्चन,बौध्द,शीख, पारसी व जैन या अल्पसंख्याक समाजांमधील उमेदवारांना द्यावयाच्या प्रशिक्षणासंदर्भात .............. आणि जिल्हाधिकारी ............ यांच्या दरम्यान करारनामा.**

..........................ही संस्था .....................या जिल्हयामध्ये पोलीस शिपाई भरती पूर्व परिक्षा प्रशिक्षण वर्ग या योजनेअंतर्गत प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करेल आणि ............. जिल्हयामधील १०० अल्पसंख्याक उमेदवारांसाठी प्रशिक्षण देईल.

१) प्रशिक्षण कार्यक्रम .......... जिल्हयामधील १०० उमेदवारांसाठी आयोजित करण्यात येईल.

२) संस्थेकडून अल्पसंख्याक समाजामधील १८ ते २५ वर्ष या वयोगटातील उमेदवारांसाठी “पोलिस शिपाई भरतीपूर्व परिक्षा प्रशिक्षण कार्यक्रम” या विषयावरील प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करण्यात येईल.

३) निवडलेल्या प्रशिक्षणार्थींची शैक्षणिक अर्हता किमान १२ वी पास असल्याचे आणि वार्षिक कौटूंबिक उत्पन्न रु.२,५०,०००/- (रु.दोन लाख पन्नास हजार फक्त) पेक्षा जास्त नसल्याची खात्री संस्था करेल.

४) प्रशिक्षणा दरम्यान ...................... या संस्थेकडून प्रशिक्षणार्थींना सामान्य ज्ञान, मराठी भाषा आणि शारिरिक क्षमता या विषयांवरील प्रशिक्षण देण्यात येईल.

५) ........ ही संस्था प्रशिक्षणासंदर्भातील अभ्यासक्रमाची आखणी जिल्हाधिकारी ...........आणि पोलीस आयुक्त/जिल्हा पोलीस अधिक्षक ............. यांचेशी सल्लामसलत करुन ठरवेल आणि त्याप्रमाणे प्रशिक्षण देईल.

६) ............ही संस्था प्रशिक्षण कालावधीमध्ये प्रशिक्षणासंदर्भात जिल्हाधिकारी............. आणि पोलीस आयुक्त/ जिल्हा पोलीस अधिक्षक ............... यांचेशी संपर्कात राहून समन्वय साधेल.

७) ........ ही संस्था प्रशिक्षणार्थींना वाचन साहित्य उपलब्ध करुन देईल/ पुरवेल.

८) ......... ही संस्था प्रशिक्षणाशी संबंधित अहवाल सादर करणे, पत्रव्यवहार करणे इ.कामे करेल.

९) ........... ही संस्था प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर प्रशिक्षणार्थींची परिक्षा घेईल आणि प्रशिक्षणार्थींना जिल्हाधिकारी................ आणि पोलीस आयुक्त/जिल्हा पोलीस अधिक्षक............ आणि संस्थेचे प्रतिनिधी यांच्या संयुक्त स्वाक्षरीने प्रशिक्षण पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र देईल.

१०) प्रशिक्षणा दरम्यान ..........................ही संस्था प्रशिक्षणार्थींसाठी सामान्य ज्ञान आणि मराठी भाषा या विषयावर दररोज किमान प्रत्येकी दीड तास (नव्वद मिनिटे) मार्गदर्शन आयोजित करेल. तसेच दररोज किमान दोन तास (१२० मिनिटे) शारिरिक क्षमता या विषयावर मार्गदर्शन/मैदानी खेळ आयोजित करेल.

११) प्रशिक्षणादरम्यान प्रशिक्षणार्थींना रविवार व्यतिरिक्त कोणत्याही दिवशी सुट्टी दिली जाणार नाही.

१२) ....................ही प्रशिक्षण संस्था प्रशिक्षणासाठी आवश्यक वर्ग खोल्या, तज्ञ प्राध्यापक/प्रशिक्षक, ग्रंथालय, वाचनालय, स्वच्छतागृह, खेळाचे मैदान इ. ची सुविधा प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण काळात विनामूल्य उपलब्ध करुन देईल.

१३) सदर प्रशिक्षणाचा कालावधी दोन महिने राहील.

१४) ......... या संस्थेस प्रशिक्षणाकरिता सामान्य ज्ञान, मराठी भाषा आणि शारिरिक क्षमता या विषयांचे मार्गदर्शन करण्याकरिता दोन तज्ञ प्रशिक्षक नेमण्याकरिता प्रति प्रशिक्षक रु.१५,०००/- (रुपये पंधरा हजार मात्र) प्रतिमाह प्रमाणे दरमहा रु.३०,०००/- (रुपये तीस हजार मात्र) याप्रमाणे दोन महिन्यांच्या प्रशिक्षणासाठी एकूण रु.६०,०००/- (रुपये साठ हजार मात्र) एवढी रक्कम देण्यात येईल.

१५) प्रशिक्षण संस्थेस प्रशिक्षणार्थींसाठी वाचनसाहित्य उपलब्ध करुन देण्याकरिता आणि प्रशासकीय कामांसाठी मिळून प्रति प्रशिक्षणार्थी रु.३००/- (रु.तीनशे मात्र) एवढी रक्कम अदा करण्यात येईल.

१६) निवडलेल्या संस्थेस प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षणादरम्यान चहापान व अल्पोपहार देण्यासाठी होणा-या खर्चापोटी रु.१५/- (रु. पंधरा फक्त) प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिन या दराने रक्कम देण्यात येईल.

१७) प्रशिक्षण संस्था प्रशिक्षणामध्ये अभ्यासक्रमानुसार,Theory आणि Practicals व्यवस्थितपणे शिकविण्यासाठी वेळापत्रक आखून जिल्हाधिकारी.................. यांना सादर करेल आणि अभ्यासक्रमानुसार प्रशिक्षण देईल.

१८) प्रशिक्षणा दरम्यान आवश्यकतेनुसार उद्योजकता विकास, स्वयंरोजगार , व्यक्तीमत्व विकास इ.विषयांवर देखील मार्गदर्शन केले जाईल.

१९) ........ या संस्थेने करारनामा करुन प्रशिक्षण सुरु केल्यानंतर संस्थेस प्रशिक्षण खर्चा संदर्भातील ५०% रक्कम (मागणी केल्यानंतर) आगाऊ रक्कम म्हणून जिल्हाधिकारी ......... यांचे मार्फत अदा करण्यात येईल आणि उर्वरित ५०% रक्कम प्रशिक्षण समाधानकारकरीत्या पूर्ण करुन अहवाल सादर केल्यानंतर अदा केली जाईल.

२०) ....... ही संस्था प्रशिक्षणाच्या प्रगतीचा वेळोवेळी / दरमहा आढावा घेऊन जिल्हाधिकारी ........... यांच्याकडे अहवाल सादर करील. तसेच वेळोवेळी प्रशिक्षण कार्यक्रमाची छायाचित्रे काढून जिल्हाधिकारी ......... यांच्याकडे सादर करेल.

२१) संस्थेने मध्येच प्रशिक्षण बंद केल्यास अथवा इतर कारणांमुळे प्रशिक्षण बंद झाल्यास प्रशिक्षणाचे दिवस वजा जाता उर्वरित रक्कम संस्थेकडून वसूल करण्यात येईल आणि अशी रक्कम संस्था त्वरित जिल्हाधिकारी ...................... यांचेकडे जमा करेल.

२२) संस्था प्रशिक्षणा दरम्यान प्रशिक्षणार्थींची हजेरी काटेकोरपणे पाहील आणि हजेरीपट, अद्यावत ठेवेल, प्रशिक्षणार्थी अभ्यासक्रम मध्येच सोडणार नाहीत याची काळजी घेईल, आणि उपस्थितीचा अहवाल जिल्हाधिकारी ..........यांना सादर करेल.

२३) संस्था प्रशिक्षण कार्यक्रम पूर्ण झाल्यानंतर विहित नमुन्यात पूर्णत्वाचा दाखला (Completion Certificate) तसेच अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate) जिल्हाधिकारी ...................यांच्याकडे सादर करेल.

२४) संस्था शासनाकडून वेळोवेळी प्रशिक्षणासाठी मिळालेल्या अनुदानाच्या पावत्या देईल. तसेच आवश्यकतेनुसार खर्चाचे अहवाल सादर करेल.

२५) सदर बाबतीत होणारा खर्च महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाकडून जिल्हाधिकारी ............ यांच्या मार्फत .............................या संस्थेस अदा करण्यात येईल.

२६) प्रशिक्षणासंदर्भात काही तंटा निर्माण झाल्यास जिल्हाधिकारी......... यांचा निर्णय अंतिम आणि बंधकारक राहील.

२७) यामधील कोणतीही अट बदलण्याचा किंवा अतिरिक्त अटी समाविष्ट करण्याचा अधिकार प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, महाराष्ट्र शासन यांना राहील.

प्रशिक्षण संस्थेच्या वतीने

१)

२)

अल्पसंख्याक विकास विभाग
महाराष्ट्र शासनाच्या वतीने

१)